जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई उपनगर या कार्यालयाच्या निर्लेखित केलेल्या वाहनाबदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२५/प्र.क्र. ३६/प्रशा-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ फेब्रुवारी, २०२५

<u>वाचा</u>:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७.०४.२०१५.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र. क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र. क्र. २१५/उद्योग-४, दि. २४.०८.२०१७.
४) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ-२०१५/प्र. क्र. १४२/प्रशा-२, दि. २६.०७.२०१७.
५) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ-२०२३/प्र. क्र. २६/प्रशा-२, दि. ०३.१०.२०२३.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वाहन-२०२४/प्र. क्र. ११/विनियम, दि. ०२.०२.२०२४.
७) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयाचे पत्र क्र. कौविरोवउआ-रवका-१/नवीन वाहन /२०२४-२५/५०८-०९, दि. २३.०१.२०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

कौशल्य, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रण याकरिता दौरे करणे, विविध स्तरावरील बैठका व क्षेत्रीय स्तरावरील कौशल्य विकास संदर्भातील कामकाज, प्रशिक्षण संस्थांना भेटी देणे, आस्थापनांची तपासणी करणे, रोजगार मेळाव्यांच्या आयोजनाकरिता विविध आस्थापना/उद्योजक यांना भेटी देणे तसेच, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी अंतर्गत आयोजित स्टार्टअप यात्रा व अनुषंगिक कामे, वरिष्ठांनी आयोजित केलेल्या बैठकांना उपस्थित राहणे अशा विविध कामकाजासाठी आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयांकरीता वाहनांची अत्यंत आवश्यकता आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र. (४) येथील दि. २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये कौशल्य विकास,

रोजगार व उद्योजकता आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयांसाठी वाहन आढावा मंजूर करण्यात आला आहे.

संदर्भ क्र. (५) येथील शासन निर्णयान्वये कौशल्य, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांच्याकरीता २ वाहने (आयुक्तांसाठी व स्टाफ कार) व जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता केंद्र, मुंबई उपनगर करीता १ अशा एकूण ३ वाहनांच्या खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार आयुक्त व आयुक्तालयाकरीता स्टाफ कार अशा २ वाहनांची विहीत पद्धतीने खरेदी करण्यात आली आहे. तथापि, पुरेशा निधी अभावी जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई उपनगर या कार्यालयासाठी वाहन खरेदी करण्यात आलेली नाही. आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. (७) च्या पत्रान्वये सदर वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर प्रस्तावास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता केंद्र, मुंबई उपनगर या कार्यालयाच्या निर्लेखित केलेल्या वाहनाबदली नवीन वाहन खरेदी करण्याकरीता खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्धतेनुसार, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- वाहन-२०२४/प्र. क्र. ११/ विनियम, दि. ०२.०२.२०२४. च्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता केंद्र, मुंबई उपनगर करीता ₹८.०० लक्षच्या कमाल मर्यादेत वाहन खरेदी करण्यात यावी. सदर वाहन किंमत मर्यादेत वस्तू व सेवा कराचा अंतर्भाव करण्यात आलेला नाही. तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनांच्या किंमतीसोबत टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभूत साहित्य इत्यादीसाठीचा खर्चाचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे.

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र. क्र. ८२/भाग-III/ उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६ व क्र. संकिर्ण-२०१६/प्र. क्र. २१५/उद्योग-४, दि. २४.०८.२०१७ मधील तरतुदींनुसार वाहन खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (Government e-Marketplace- GeM) पोर्टलवरुन विहीत पद्धतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३) जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता केंद्र, मुंबई उपनगर या कार्यालयाच्या निर्लेखित केलेल्या वाहनाबदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आलेले नाही, याची खातरजमा करण्याची जबाबदारी सहायक आयुक्त, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता केंद्र, मुंबई उपनगर यांची राहील.

४) संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र शासन, वांद्रे यांच्याकडे वाहनाचा विमा उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील, याची दक्षता घ्यावी.

२. सदर वाहन खरेदीकरीता येणारा खर्च मागणी क्र. झेड ए ०२, ००४, संशोधन, सर्वेक्षण व सांख्यिकी, (०१) रोजगार उपलब्धतेची माहिती, (०१)(०१) रोजगार उपलब्धता माहिती व युवक रोजगार सेवा (अनिवार्य), २२३०११०७-१३ (कार्यालयीन खर्च) या लेखाशिर्षातून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीतून करण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधीपेक्षा अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. १७.०४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, उपविभाग २, अनुक्रमांक १९ ब, नियम क्र. ६९ अन्वये राज्यस्तरीय वाहन आढावा समितीस प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन सदर समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०६/२०२३/विनियम, दि.१७.०८.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४१३०८५३२६०३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADEEP
SAHEBRAO
SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT,
2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2025.02.14 13:10:33 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) अपर मुख्य सचिव, कौशल्य ,रोजगार उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक.

२) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई.

३) सहायक आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई उपनगर.

४) महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६) कक्ष अधिकारी (व्यय-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती- कार्यासन प्रशा-२